**महापार ही प्रणाली दि.०३.०७.२०१७ पासून प्रत्यक्ष कामकाजासाठी उपलब्ध करून देणेबाबत आणि कार्यमूल्यमापन अहवाल ऑनलाईन पध्दतीने नोंदविण्यासाठी सुधारित वेळापत्रक**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक : सीएफआर १२१७/प्र.क्र. ३७/का.१३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २९ जून, २०१७.

**वाचा :** १. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : सीएफआर १२११/प्र.क्र. २५७/१३, दि. ०२.०२.२०१७.
२. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : सीएफआर १२१७/प्र.क्र.३७/१३, दि.२१.०३.२०१७.
३. शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग क्रमांक:सीएफआर १२११/प्र.क्र.२५७/१३, दि.२१.०४.२०१७.
४. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : सीएफआर १२१७/प्र.क्र.७३/१३, दि.२३.०६.२०१७.

**शासन परिपत्रक :-**

गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांच्या कार्यमूल्यमापन अहवालामध्ये उक्त संदर्भ क्र.१ येथील दि.०२.०२.२०१७ च्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली असून नवीन कार्यमूल्यमापन अहवाल सन २०१६-१७ या प्रतिवेदन वर्षापासून लागू करण्यात आला आहे. त्याचप्रमाणे सदर शासन निर्णयात नमूद केलेल्या गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांसाठी सदर कार्यमूल्यमापन अहवाल ऑनलाईन पध्दतीनेच नोंदविणे अपेक्षित आहे.

२. ऑनलाईन पध्दतीने कार्यमूल्यमापन अहवाल नोदविण्यासाठी विकसित करण्यात आलेली MahaPAR ही ऑनलाईन प्रणाली कार्यन्वित झालेली असून **दि.०३.०७.२०१७ पासून ती प्रत्यक्ष वापरासाठी उपलब्ध होणार आहे.** त्याकरिता संदर्भ क्र.४ येथील दि.२३.०६.२०१७ च्या शासन परिपत्रकान्वये पूर्वघोषित समन्वय अधिकाऱ्यांना राज्य परिरक्षक(State Custodian) आणि संबंधित संवर्गाचे मंत्रालयीन अवर सचिव/कक्ष अधिकारी यांना माहिती व्यवस्थापक (EMD Manager) म्हणून घोषित करण्यात आले आहे. तसेच या संबंधित अधिकाऱ्यांना MahaPAR या प्रणालीच्या वापरासाठीचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत.

३. ज्या गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांचे सन २०१६-१७ चे कार्यमूल्यमापन MahaPAR या ऑनलाईन संगणक प्रणालीमध्ये नोंदविणे अपेक्षित आहेत त्या अधिकाऱ्यांच्या कार्यमूल्यमापन अहवालासाठी सुधारित वेळापत्रक संदर्भ क्र.२ येथील परिपत्रकान्वये निश्चित करण्यात आले होते. तथापि, MahaPAR ही प्रणाली प्रत्यक्षात कार्यान्वित करण्यास झालेला विलंब विचारात घेवून संदर्भ क्र.२ येथील दि.२१.०३.२०१७ च्या परिपत्रकान्वये विहीत केलेल्या वेळापत्रकामध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे:

| जबाबदार अधिकारी | कार्यवाहीचे स्वरुप | कार्यवाहीचा कालावधी |
|---|---|---|
| अतिरीक्त परिक्षक | MahaPAR या प्रणालीत कार्यमूल्यमापन अहवाल तयार करून संबंधित अधिकाऱ्यांकडे पाठविणे | ३ जुलै ते २१ जुलै,१७ |
| संबंधित अधिकारी | स्वयंमूल्यनिर्धारण | १९ ऑगस्ट,१७ पर्यंत |
| प्रतिवेदन अधिकारी | प्रतिवेदन अधिकाऱ्यांचे मूल्यमापन | २ सप्टेंबर,१७ पर्यंत |
| पुनर्विलोकन अधिकारी | पुनर्विलोकन अधिकाऱ्यांचे मूल्यमापन | १६ सप्टेंबर,१७ पर्यंत |
| अतिरिक्त परिक्षक | संबंधित अधिकाऱ्यांस प्रत उपलब्ध करुन देणे | ३० सप्टेंबर,१७ पर्यंत |

माात्र, सन २०१७-१८ पासून संदर्भ क्र.१ येथील दि.०२.०२.२०१७ च्या परिपत्रकान्वये विहीत केलेल्या वेळापत्रकानुसार कार्यवाही करण्यात यावी.

४. **या प्रणालीच्या वापराकरिता सर्वप्रथम सर्व संबंधित संवर्गांसाठी अतिरीक्त परिरक्षक(Alternate Custodian) आणि पार व्यवस्थापक(PAR Manager) घोषित करणे आणि त्यांना NIC मार्फत MahaPAR या प्रणालीमध्ये अधिकार (Privilege) प्रदान करणे आवश्यक आहे. ही जबाबदारी सर्व संबंधित संवर्गांच्या समन्वय अधिकाऱ्याची असून त्यांनी ही कार्यवाही कोणत्याही परिस्थितीत दि.०१.०७.२०१७ पूर्वी पूर्ण करावी व त्याबाबत सामान्य प्रशासन विभाग व NIC ला अवगत करावे.**

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१७०६२९१७५५१६०५०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil R Joshi

Digitally signed by Sunil R Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ed693ebe82bd686692d892835315578f33ccb3e0629da8fc85869c852933fb68, cn=Sunil R Joshi
Date: 2017.06.30 11:07:54 +05'30'

**(सु.रा.जोशी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभाग.
२. सह सचिव/उप सचिव (गृह विभाग ,महसूल विभाग, वित्त विभाग , ग्राम विकास विभाग, सहकार विभाग, नगर विकास विभाग,सामान्य प्रशासन विभाग),मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
३. सर्व मंत्रालयीन विभागाच्या आस्थापना शाखा.
४. उप सचिव (का.१३), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. राज्य सूचना अधिकारी, NIC, मुंबई.
६. निवडनस्ती/कार्यासन १३.